**आहरण व संवितरण अधिकारी तसेच नियंत्रक अधिकारी घोषित करणेबाबत.....**

# महाराष्ट्र शासन

## आदिवासी विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांकः** बीयुडी-२०२४/प्र.क्र.०२/ कार्यासन-६
विस्तार इमारत, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
तारीखः २९ मार्च, २०२५

**संदर्भ :-** बांधकाम व्यवस्थापन कक्ष, आदिवासी विकास विभाग, नस्ती क्र. आविवि-२०२४/ बांव्यक/प्र.क्र.२६४/बांधकाम व्यवस्थापन कक्ष

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत योजनांचे मूल्यमापन, संनियंत्रण व उपयोगिता तपासणे या योजनेंतर्गत बाह्यस्त्रोताद्वारे मनुष्यबळ पुरविण्यासाठी आदिवासी विकास विभागाच्या बांधकाम व्यवस्थापन कक्षामार्फत नेमणूक करण्यात आलेल्या मे. सी. एस. सी., ई-गव्हर्नन्स सर्व्हिस इंडिया. लि., नवी दिल्ली या संस्थेस मानधनावरील निधीचे आहरण व संवितरणासाठी 'आहरण व संवितरण अधिकारी' म्हणून घोषित करण्याबाबत संदर्भाधीन नस्तीद्वारे प्रस्ताव प्राप्त झाला आहे. त्यानुसार निधी वितरणासाठी 'नियंत्रक अधिकारी' तर निधीचे आहरण व संवितरणासाठी 'आहरण व संवितरण अधिकारी' म्हणून घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

## शासन निर्णय

**'आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत योजनांचे मूल्यमापन, संनियंत्रण व उपयोगिता तपासणे'** या योजनेचे लेखाशिर्ष २२२५ एफ २८१ अंतर्गत बाह्यस्त्रोताद्वारे मनुष्यबळ पुरविण्यासाठी नेमणूक केलेल्या मे. सी. एस. सी., ई-गव्हर्नन्स सर्व्हिस इंडिया. लि., नवी दिल्ली या संस्थेस मानधनावरील निधीचे वितरणासाठी अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) मंडळ, नाशिक यांना **'नियंत्रक अधिकारी'** तर निधीचे आहरण व संवितरणासाठी कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) मंडळ, नाशिक यांना **'आहरण व संवितरण अधिकारी'** म्हणून घोषित करण्यात येत आहे.

२. हा शासन निर्णय महाराष्ट्र कोषागार नियम, १९६८ खंड-१ मधील नियम १५(३) व १५६ तसेच वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८ भाग -पहिला, दि. १७ एप्रिल, २०१५ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारांनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२९१४२७४७३९२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KIRAN KISANRAO PAWAR

Digitally signed by KIRAN KISANRAO PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=68d8b19f123ba59448c0926a91296205b9a87463f831a2beea0be5cb381a34e8, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=344DE3FF07B9439DD11CAF728255A5EB0A0DD495EF82F989931088637D8211C0, cn=KIRAN KISANRAO PAWAR
Date: 2025.03.29 17:33:04 +05'30'

**(किरण कि. पवार)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. मंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. राज्य मंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
४. आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, नाशिक
५. मुख्य अभियंता, बांधकाम व्यवस्थापन कक्ष, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
६. अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) मंडळ, नाशिक
७. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) मंडळ, नाशिक
८. महालेखापाल (लेखापरिक्षण)/ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/ नागपूर
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१०.जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई
११.वित्त विभाग, वित्तीय सुधारणा/व्यय-१४/अर्थसंकल्प-७, मंत्रालय, मुंबई
१२.उप अभियंता, बांधकाम व्यवस्थापन कक्ष, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३.निवड नस्ती, कार्यासन-६, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई